अल्पसंख्यांक विकास विभागाच्या
अधिपत्त्याखाली असलेल्या मौलाना आझाद
अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाच्या
लाभार्थ्यांना कर्ज माफी देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
अल्पसंख्यांक विकास विभाग,
**शासन निर्णय**, क्रमांकः मौआम-२००९/प्र.क्र.२३६/का.८,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १७ नोव्हेंबर, २००९.

**प्रस्तावना :-**

राज्यातील अल्पसंख्याकांच्या समाजातील आर्थिकदृष्टया दुर्बल घटकांना स्वयंरोजगार सुरू करण्यासाठी व त्याव्दारे त्यांचा आर्थिक स्तर उंचावून त्यांच्या एकंदर रहाणीमानात सुधारणा घडवून आणण्यासाठी "मौलाना आझाद अल्पसंख्याक आर्थिक विकास महामंडळ" या महामंडळाची स्थापना दि.२८/०९/२००० रोजी कंपनी कायदा १९५६ अन्वये करण्यात आली आहे.

मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाकडून विविध योजनांव्दारे अल्पसंख्याकांच्या समाजातील आर्थिकदृष्टया दुर्बल उमेदवारांना कर्ज पुरवठा केला जातो. महामंडळाचे लाभार्थी हे अल्प उत्पन्न गटातील असल्याने व परिणामी त्यांच्यामध्ये शिक्षणाचे प्रमाण तुलनेने कमी असल्याने सुव्यवस्थित आर्थिक नियोजनाच्या अभावी इच्छा असूनही महामंडळाकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्यास ते असमर्थ ठरतात. या बाबीचा सहानुभूतीपूर्वक विचार करून महामंडळाकडून वितरीत करण्यात आलेल्या कर्जाची थकीत रक्कम माफ करण्याबाबतची मागणी विविध स्तरावरुन व लोक प्रतिनिधींकडून सातत्याने करण्यात येत होती. यासंदर्भात दि.२५/८/२००९ रोजी झालेल्या मंत्रिमंडळ बैठकीत झालेल्या निर्णयानुसार मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाच्या लाभार्थ्यांना कर्जमाफी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

अल्पसंख्यांक विकास विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखालील मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळाच्या लाभार्थ्यांना खालील प्रमाणे कर्जमाफी देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहेः-

१. मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळामार्फत वाटप करण्यात आलेल्या कर्जापैकी सर्व लाभार्थ्यांकडे दि.३१/३/२००७ अखेर थकीत असलेले महामंडळाचे व्याजासह कर्ज रु.१७.२२ कोटी माफ करण्यात येत आहे.

२. लाभार्थ्यांचे थकीत कर्ज माफ करण्यासाठी महामंडळास प्रतिपूर्तीने अदा करण्यासाठी लागणारा एकूण निधी रू. १७.२२ कोटी उपलब्ध करुन देण्याबाबत स्वतंत्र शासन निर्णय निर्गमित करण्यात येईल.

२. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्या विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.६२०/०९ व्यय-४, दि. १०/११/२००९अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

३. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र. २००९१११७१७०९२१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( उ.सं. दांडेकर )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव,
मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री, अल्पसंख्यांक विकास, मंत्रालय, मुंबई.
मा. राज्यमंत्री, अल्पसंख्यांक विकास, मंत्रालय, मुंबई.
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
मा. अध्यक्ष, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ,मुंबई
प्रधान सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, मौलाना आझाद अल्पसंख्यांक आर्थिक विकास महामंडळ,मुंबई
महालेखापाल, महाराष्ट्र-१,(लेखा व अनुज्ञेयता)मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र-१,(लेखा परीक्षा) मुंबई
वित्त विभाग,(साऊ) (व्यय-४)(अर्थसंकल्प-१४) मंत्रालय, मुंबई
नियोजन विभाग, (कार्या.१४७५).
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
निवड नस्ती.